GR-200408141236480001-1700

**सन २००१ च्या जनगणनेनुसार ज्या शहराची लोकसंख्या ५०,००० वा त्यापेक्षा जास्त आहे अशा शहरामध्ये वाल्मिकी आंबेडकर आवास योजना सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : लोआयो-१००२/प्र.क्र.१८३/गृनिधो-२,**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२**
**दिनांक : १२.१.२००४**

संदर्भ : १) शासन निर्णय,गृहनिर्माण विभाग, क्रमांक : एचएसजी-२०००/ प्र.क्र.६०/ गृनिधो-१,दिनांक ११.८.२०००, दि.५ऑक्टोबर,२०००, २८ डिसेंबर २०००, क्रमांक - एचएसजी ११२१ प्र.क्र. १०७/गृनिधो-२, दि. ५ मे, २००१, क्रमांक - गृनिधो- ११२१ /प्र.क्र. ३६५/गृनिधो-२, दि. ७ जानेवारी, २००२, क्रमांक - लोआयो १००२/प्र.क्र.२०१/गृनिधो-२, दि. १८ डिसेंबर२००२, क्रमांक - लोआयो १००२/प्र.क्र.२०१/गृनिधो-२, दिनांक २ जुलै,२००३ क्रमांक लोआयो ११२२/प्र.क्र. १०३/ गृनिधो-२, दि.१३ जानेवारी,२००३

२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, एचएसजी २००२/प्र.क्र.४/गृनिधो-१, दिनांक ११.१.२००२, दि. ८ नोव्हेंबर२००३, दि. १३ नोव्हेंबर २००२, आणि दि.१४ जानेवारी,२००३

**प्रस्तावना :** सन १९९१ च्या जनगणनेनुसार ज्या शहराची लोकसंख्या ५०,००० वा त्यापेक्षा जास्त आहे, अशा शहरांमधील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचावण्यासाठी तसेच झोपडपट्ट्यांमध्ये राहणाऱ्या लोकांचे राहणीमान सुधारण्यासाठी पुरेसा निवारा उपलब्ध व्हावा, यासाठी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये अनुक्रमे लोक आवास योजना, आणि वाल्मिकी आंबेडकर आवास योजना, ची अंमलबजावणी करण्याचे निदेश देण्यांत आलेले आहेत.

लोक आवास योजना आणि वाल्मिकी आंबेडकर आवास योजना, या दोन्ही योजनेतील लाभार्थी योजनेच्या निकषाप्रमाणे समान असल्याने. त्याचप्रमाणे आणि दोन्ही योजना झोपडपट्टीवासियांसाठीच समांतर राबवित असल्याने. या योजनांपैकी वाल्मिकी आंबेडकर आवास योजने अंतर्गत जास्त अनुदान उपलब्ध होत असल्यामुळे लाभार्थ्यांचा कल लोक आवास योजनेपेक्षा वाल्मिकी आंबेडकर आवास योजनेकडे वाढल्यामुळे साहजिकच लोक आवास योजनेस प्रतिसाद मिळत नसल्याने सदरहू योजना राबविण्याबाबत फेर विचार करणे आवश्यक ठरले. लोक आवास योजनेस यापुढे प्रतिसाद मिळत नसल्याने, पुढे चालू ठेवावी किंवा कसे असा प्रश्न शासनाच्या विचाराधिन होता.

तसेच गेल्या १२ वर्षामध्ये शहरी करणामध्ये वाढ झाल्यामुळे आणि त्याचबरोबर झोपडपट्टीविषयक धोरणाप्रमाणे संरक्षण पात्र झोपडपट्टीधारकांची संख्या वाढल्यामुळे विविध मान्यवरांकडून, लोकप्रतिनिधींकडून

सततची मागणी करण्यांत येत होती की, झोपडपट्टीवासियांसाठी राबविण्यांत येत असलेली वाल्मिकी आंबेडकर योजने अंतर्गत लाभ देण्यासाठी सन २००१ च्या जनगणनेच्या आधारावर देण्यांत यावी.

शासनाचे झोपडपट्टी विषयक धोरण, झोपडपट्टीवासियांसाठी राबविण्यांत येत असलेल्या योजना आणि विविध संस्थांकडून/लोकप्रतिनिधींकडून होत असलेली मागणी, या व इतर अनुषंगिक बाबींचा साकल्याने विचार करुन सन २००१ च्या जनगणनेनुसार ज्या शहरांची लोकसंख्या ५०,००० वा त्यापेक्षा जास्त आहे अशा शहरामध्ये वाम्बी योजनेची अंमलबजावणी करता यावी, यासाठी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

१) संदर्भाधिन शासन निर्णयातील निकषामध्ये बदल करण्यांत येऊ नये.

२) लोक आवास योजना स्थगित ठेवण्यांत यावी.

३) ज्या घरकुलांचे प्रत्यक्ष बांधकाम, लोक आवास योजने अंतर्गत सुरु आहेत, ती घरे लोक आवास योजने अंतर्गत पूर्ण करण्यांत यावी. यामध्ये कोणताही बदल करण्यांत येऊ नये.

४) ज्या घरांचे प्रत्यक्ष बांधकाम लोक आवास योजने अंतर्गत सुरु झालेले नाही, त्या सर्व घरांचे बांधकाम वाम्बी योजने अंतर्गत घेण्यांत यावेत.

५) यापुढे लोक आवास योजने अंतर्गत येणारी कामे वाम्बी योजने अंतर्गत पूर्ण करावीत.

६) ज्याप्रमाणे वाम्बी योजनेच्या नांवे बॅंकेमध्ये खाते सुरु करण्यांत आले आहे, त्याचप्रमाणे राष्ट्रीय झोपडपट्टी सुधार योजने अंतर्गत जी रक्कम दरवर्षी उपलब्ध होते त्यातील योजनेच्या निकषाप्रमाणे १० टक्के रक्कम वळती करुन लोक आवास योजनेच्या नांवाने स्वतंत्र खाते सुरु करण्यांत यावे, आणि जमा होणारी रक्कम वाम्बी योजनेसाठी निश्चित करण्यांत आलेल्या निकषाप्रमाणे वापरण्यांत यावी.

७) राज्यातील नागरी/अर्धनागरी शहरातील जास्तीत जास्त झोपडपट्टीवासियांना वाम्बी योजनेचा लाभ मिळावा, यासाठी सन २००१ च्या जनगणनेप्रमाणे, ज्या शहरांची लोकसंख्या ५०,००० वा त्यापेक्षा जास्त आहेत अशा सोबत जोडलेल्या तक्त्यातील अतिरिक्त शहरांमध्ये वाम्बी योजना लागू करण्यांत येत आहे या योजनेची अंमलबजावणी संदर्भ क्रमांक २ येथील दर्शविलेल्या शासन निर्णयातील निकषाप्रमाणे करण्यांत यावी .

८) हा शासन निर्णय नियोजन आणि वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे ६९४९ /अमुस /निवि. ,दि. २१.१०.२००३, आणि ८०० व्यय-३, दि. २४.११.२००३ अन्वये पारीत करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( डॉ. सुरेश जोशी)
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग,

# तक्ता

| अ.क्र. | मंडळाचे नांव | जिल्हा | वाम्बी योजना लागू करावयाच्या शहरांची नांवे. |
|---|---|---|---|
| १. | कोकण | रायगड | खोपोली |
| | | ठाणे | पालघर |
| | | ठाणे | नवघर-माणिकपूर |
| २. | पुणे | पुणे | लोणावळा |
| | | पुणे | बारामती |
| | | सांगली | उरण -इस्लामपूर |
| | | सातारा | फलटण |
| ३. | नाशिक | अहमदनगर | कोपरगांव |
| | | अहमदनगर | संगमनेर |
| | | धुळे | शिरपूर-वरवाडे |
| | | जळगांव | चोपडा |
| ४. | औरंगाबाद | हिंगोली | वसमत |
| ५. | अमरावती | अमरावती | अंजनगाव-सुर्जी |
| | | बुलढाणा | शेगांव |
| | | वाशिम | कारंजा |
| | | यवतमाळ | वणी |
| ६. | नागपूर | चंद्रपूर | भद्रावती |